**मान्यताप्राप्त व अनुदानित संस्थांच्या कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधी, व्यवसाय कर, गटविमा योजना, डीसीपीएस यांच्या वजातीच्या रकमा शासकीय कोषागारात समायोजित करण्याबाबत व वजातीच्या अनुसूच्या देयकासोबत जोडण्याची कार्यवाही बंद करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१४/प्र.क्र.१५/कोषा प्र.५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीखः १५ जुलै, २०१५.

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-१००८/प्र.क्र.७१/कोषा-प्र-५ दिनांक २२/९/२००८.

२) शासन शुध्दीपत्रक क्रमांकः संकीर्ण-१००८/प्र.क्र.७१/कोषा प्र-५ दिनांक २५ ऑगस्ट २००९.

३) शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-१००८/प्र.क्र.६८/कोषा प्र-५ दिनांक ३० मार्च २००९.

**प्रस्तावना -**

राज्यातील आदिवासी विकास, सामाजिक न्याय, शालेय शिक्षण, उच्च व तंत्रशिक्षण, कृषि, दुग्ध व्यवसाय विकास आणि पशुसंवर्धन, मत्स्य व्यवसाय विकास, जलसंपदा, नगर विकास आणि इतर सर्व प्रशासकीय विभागांच्या अधिपत्याखालील खाजगी, अनुदानित मान्यताप्राप्त प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा, महाविद्यालये, विद्यापिठे आणि इतर संस्था तसेच जिल्हा परिषदा, नगरपालिका, इत्यादी मधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांच्या वेतनाकरिता शासनाकडून सहाय्यक अनुदान देण्यात येते. या प्रित्यर्थची एकूण स्थूल रक्कम सहाय्यक अनुदान देयकाचा नमुना (महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मध्ये नेमून दिलेला नमुना ४४) कोषागारावर सादर करुन आहरीत करण्यात येते. मात्र अशा वेतन देयकातून विविध प्रकारच्या कपातीच्या रकमांची कपात करण्याकरीता विविध प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील विविध संस्था वेगवेगळी पध्दत अवलंबतात. अशाप्रकारच्या कपातीत एकसूत्रता नसल्याचे आढळून आले आहे. त्यामुळे, वजातीच्या रकमा देयकात दर्शविण्याकरीता तसेच फक्त निव्वळ रक्कम आहरीत करण्याकरीता एकसूत्र कार्यपध्दती नेमून देण्यासाठी शासन आदेश निर्गमीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

या संदर्भात शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे

१) जिल्हा परिषदांकडून कोषागारांमार्फत (महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मध्ये नेमून दिलेला नमुना ४४) वेतनासाठीच्या सहाय्यक अनुदानाच्या स्थूल रक्कमा आहरीत न करता यापुढे व्यवसाय कर, आयकर, गटविमायोजना, भविष्य निर्वाह निधी व डीसीपीएस या योजनेखालील वजातीच्या रकमा समायोजित करुन निव्वळ रक्कम आहरीत करावी. त्याचप्रमाणे ज्या ठिकाणी कर्मचा-यांना राज्य सरकारकडील शासकीय निवासस्थान उपलब्ध करुन देण्यात आले आहे, त्या ठिकाणी अनुज्ञप्ती शुल्क (License Fee) व परिरक्षण शुल्क (Service Charges) यांच्याही वजाती दर्शविण्यात येऊन निव्वळ रक्कम आहरित करावी.

२) कोषागारांनी अशा रकमांचे समायोजन त्यांच्या लेख्यात करुन वेतनाच्या निव्वळ रकमा इलेक्ट्रॉनिक पध्दतीने संबंधित कर्मचाऱ्यांच्या बँक खात्यात थेटपणे जमा कराव्यात. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या स्तरावर समायोजित करण्यात येणाऱ्या काही रकमा असल्यास, अशा रकमा संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याच्या बँक खात्यात इलेक्ट्रॉनिक पध्दतीने थेटपणे जमा कराव्यात.

३) राज्यातील आदिवासी विकास, सामाजिक न्याय, शालेय शिक्षण, उच्च व तंत्रशिक्षण, कृषि, दुग्ध व्यवसाय विकास आणि पशुसंवर्धन, मत्स्य व्यवसाय विकास, जलसंपदा, नगर विकास आणि इतर सर्व प्रशासकीय विभागांच्या अधिपत्याखालील खाजगी, अनुदानित मान्यताप्राप्त प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा, महाविद्यालये, विद्यापिठे आणि इतर संस्था तसेच जिल्हा परिषदा, नगरपालिका मधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांच्या वेतनाकरिता शासनाकडून द्यावयाच्या सहाय्यक अनुदानाच्या रकमा यापुढे व्यवसाय कर, गटविमायोजना, भविष्य निर्वाह निधी व डीसीपीएस (ज्यांचे लेखे अशा संस्थांच्या स्तरावर ठेवण्यात येतात मात्र रक्कम शासकीय कोषागारात जमा केली जाते) या योजनेखालील वजातीच्या रकमा समायोजित करुन निव्वळ रक्कम आहरीत करावी. त्याचप्रमाणे ज्या ठिकाणी कर्मचा-यांना राज्य सरकारकडील शासकीय निवासस्थान उपलब्ध करुन देण्यात आले आहे, त्या ठिकाणी अनुज्ञप्ती शुल्क (License Fee) व परिरक्षण शुल्क (Service Charges) यांच्याही वजाती दर्शविण्यात येऊन निव्वळ रक्कम आहरित करावी.

४) कोषागारांनी अशा रकमांचे समायोजन त्यांच्या लेख्यात करुन वेतनाच्या निव्वळ रकमा इलेक्ट्रॉनिक पध्दतीने संबंधित कर्मचाऱ्यांच्या बँक खात्यात थेटपणे जमा कराव्यात. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या स्तरावर समायोजित करण्यात येणाऱ्या काही रकमा असल्यास, अशा रकमा संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याच्या बँक खात्यात इलेक्ट्रॉनिक पध्दतीने थेटपणे जमा कराव्यात..

५) राज्यातील आदिवासी विकास, सामाजिक न्याय, शालेय शिक्षण, उच्च व तंत्रशिक्षण, कृषि, दुग्ध व्यवसाय विकास आणि पशुसंवर्धन, मत्स्य व्यवसाय विकास, जलसंपदा, नगर विकास आणि इतर सर्व प्रशासकीय विभागांच्या अधिपत्याखालील खाजगी, अनुदानित मान्यताप्राप्त प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा, महाविद्यालये, विद्यापिठे आणि इतर संस्था तसेच जिल्हा परिषदा, नगरपालिका मधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांच्या वेतनाकरिता शासनाकडून द्यावयाच्या सहाय्यक अनुदानाच्या रकमेतून केली जाणारी आयकराची वसूली कोणत्या स्तरावर करावी, याबाबत संबंधित प्रशासकीय विभागाने त्यांच्या स्तरावर निर्णय घ्यावा. जर अशी वसूली कोषागारांनी समायोजित करावयाची रक्कम म्हणून दर्शवावयाची झाल्यासच सदरची कपात नमूना क्रमांक ४४ मधील देयकावर करण्यात यावी.

६) सदर देयकातून अनुज्ञप्ती शुल्क (License Fee) व परिरक्षण शुल्क (Service Charges) यांच्या वजाती वगळता, समायोजित करावयाच्या इतर प्रकारच्या वजावटीच्या रकमांच्या अनुसूची कोषागारांकडे सविस्तर तपशीलासह पाठविण्याची आवश्यकता यापुढे राहणार नाही. समायोजनाने दर्शविलेल्या वजावटीच्या रक्कमांसंबंधातील चलनाच्या प्रती देयकासोबत जोडण्यात याव्यात. सदरच्या चलनावर संपूर्ण अर्थसंकल्पीय वर्गीकरण (लेखाशिर्ष, उपशिर्ष, गौणशीर्ष, योजना सांकेतांक, इत्यादी) दर्शवावे. तसेच चलनातील रक्कमेत अंतर्भूत असलेल्या एकूण कर्मचा-यांची संख्या व वसूलीचे प्रयोजन/ कारण याबाबतचा तपशिल नोंदविण्यात यावा.

७) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन (डीसीपीएस) योजनेखाली संबंधित विभागांनी यापूर्वी निर्गमित केलेल्या शासन निर्णयांमध्ये आवश्यकतेनुरुप योग्य तो बदल करुन शुध्दीपत्रक निर्गमित करण्याची कार्यवाही करावी.

८) सदरचे आदेश माहे जुलै, २०१५ च्या वेतनाकरीता आहरीत करावयाच्या सहाय्यक अनुदानाच्या देयकापासून अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१५१५१३०८०१०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Narayan Bhaskar Ringane

Digitally signed by Narayan Bhaskar Ringane
DN: CN = Narayan Bhaskar Ringane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.07.15 15:38:06 +05'30'

**ना. भा. रिंगणे**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२.सर्व सन्मानिय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,
३.राज्यपालांचे सचिव
४.मुख्यमंत्र्यांचे सचिव
५.सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७.मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८.प्रबंधक, मुळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९.प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१५.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७.सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२१.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२.सर्व विभागीय आयुक्त
२३.सर्व जिल्हाधिकारी
२४.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५.संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२६.अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
२७.सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
२८.मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
२९.सहसंचालक,स्थानिक निधी लेखा मुंबई /पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
३०.वित्त विभागातील सर्व कार्यासने
३१.निवड नस्ती कोषा प्र.५

Deductions on account of GIS, GPF, DCPS/NPS, Profession Tax as also stoppage of schedules therefore and deductions on account of the amount of license fees and service charges in respect of Government accommodation being provided to the employees, to be made adjustable by Treasuries in respect of salaries payable to the employees of the Recognized and Aided Institutions under various Departments.

**Government of Maharashtra**
**Finance Department**
**Government Resolution No.: Misc. - 2014/C.R.15/Kosha Pra-5**

Madam cama Road, Hutatma Chowk,
Mantralaya, Mumbai-400 032.
Date: 15th July, 2015.

**Read -**

1. **1) Government Resolution No.: Misc. -1008/C.R.71/Kosha Pra-5, dated 22/09/2008.**
2. **Government Resolution No.: Misc. -1008/C.R.71/Kosha Pra-5, dated 25/08/2009.**
3. **Government Resolution No.: Misc. -1008/C.R.68/Kosha Pra-5, dated 30/03/2009.**

**Introduction -**

The Recognized and Aided Primary, Secondary & Higher Secondary Schools, Colleges, Universities & other Institutions under the Agriculture, Animal Husbandry, Dairy Development, Fisheries, Social Justice, School Education, Higher & Technical Education, Tribal Welfare, Irrigation and others Departments and Zilla Parishads and Nagar Parishads, Boards, etc., receive grant-in-aid for salaries of their employees from the Government. The amount of grant-in-aid is withdrawn in lump sum by submitting a grant-in-aid bill (Form 44 set out in the Maharashtra Treasury Rules, 1968) to the Treasuries. However, different Institutions under different Departments are not adopting a standard procedure for effecting various deductions (adjustable by Treasuries) to be made from the gross amount of grant-in-aid payable to them. Therefore, the question of prescribing a standard procedure for deductions to be made from grant-in-aid amount for salaries & adjusting them in the accounts of Treasury was under the consideration of the Government.

**Resolution-**

Government now resolves as follows

.1) Deductions on account of Profession Tax, Income Tax, GIS, GPF, DCPS/NPS should be made from the grant-in-aid bill for salaries (Form 44 set out in the Maharashtra Treasury Rules, 1968) payable to the Zilla Parishads. Similarly the license fees and service charges in respect of Government accommodation being provided to the employees should also being recovered from such grant-in-aid

.2) These deductions should be adjusted by the Treasuries in their accounts & only the net amount should be disbursed, electronically, preferably directly into the bank accounts of the employees. Amount of deductions adjustable by DDO, if any, should be disbursed into the bank account of the DDO electronically.

3) Deductions on account of Profession Tax, GIS, GPF, DCPS/NPS (where the detailed accounts are maintained by the institution but the amount is paid into the Government Treasury), Profession Tax should be made from the grant-in-aid bill for salaries (Form 44 set out in the Maharashtra Treasury Rules, 1968) payable to the Recognized and Aided Institutions under Agriculture, Animal Husbandry, Dairy Development, Fisheries, Social Justice, School Education, Higher & Technical Education, Tribal Welfare, Irrigation, Urban Development and all other Departments. Similarly the license fees and service charges in respect of Government accommodation being provided to the employees should also be recovered from such grants.

4) These deductions should be adjusted by Treasuries in their accounts & only the net amount should be disbursed, preferably directly into the bank accounts of the employees electronically. Amount of deductions adjustable by DDO, if any, should be disbursed into the bank account of the DDO electronically.

5) The Administrative Departments should decide the level at which deduction on account of Income Tax should be made from the grant-in-aid bill for salaries (Form 44 set out in the Maharashtra Treasury Rules, 1968) payable to the Recognized and Aided Institutions under Agriculture, Animal Husbandry, Dairy Development, Fisheries, Social Justice, School Education, Higher & Technical Education, Tribal Welfare, Irrigation, Urban Development and all other Departments. Only if such deduction is to be made adjustable by Treasuries, it should be shown as deduction in Form 44.

6) The schedules for such deductions excepting those for license fees and service charges in respect of Government accommodation being provided to the employees, need not be submitted to the Treasury along with the grant-in-aid bill. Only challans for such deductions should be enclosed with such bill. The full budget classification (major, minor, sub, sub detailed head, scheme code, etc.), total number of employees for whom deduction is made and reason of recovery should be mentioned on such challans.

7) The concerned Administrative Departments should issue corrigendum to the Government Resolutions already issued by them, if necessary.

8) These orders shall be applicable from the grant-in-aid bills for salaries for the month of July, 2015.

This Government resolution of Maharashtra Government is available at the website www.maharashtra.gov.in. Reference no. for this is 201507151513080105. This order has been signed digitally.

By order and in the name of the Governor of Maharashtra.

Narayan Bhaskar Ringane

Digitally signed by Narayan Bhaskar Ringane
DN: CN = Narayan Bhaskar Ringane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.07.15 15:39:47 +05'30'

**N.B.Ringane**

Deputy Secretary, Govt. of Maharashtra.

************